201103231538190001

राज्यातील नगरपालिका /महानगरपालिकांना रस्ते दुरुस्ती,रस्ते बांधणीसाठी सर्वसाधारण रस्ता अनुदान सन २०१०-११ या आर्थिक वर्षात वितरीत करण्याबाबत..............................

(फेब्रुवारी,२०११)

# महाराष्ट्र शासन

नगर विकास विभाग,

शासन निर्णय क्रमांक :- जीईएन -२०१०/प्र.क्र १३१/नवि-१६ (IV)

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांक :- २४ फेब्रुवारी, २०११.

वाचा :

१) शासन निर्णय नगर विकास विभाग व सार्वजनिक आरोग्य विभाग क्र.आरडीएस-३६७५/१५२०/पीएच-१४, दिनांक ३१ मे, १९७५.

२) शासन परिपत्रक वित्त विभाग क्रमांक अंदाज- २०१०/प्र.क्र. ६५/२००९ अर्थसंकल्प-३, दिनांक ०३ एप्रिल, २०१०.

३) शासन परिपत्रक,वित्त विभाग क्रमांक अंदाज २०१०/प्र.क्र. ७१/२०१० अर्थसंकल्प-३, दिनांक १८ मे, २०१०.

४) शासन निर्णय नगर विकास विभाग क्रमांक यानियो-२०१०/प्र.क्र ६३/ नवि-४, दिनांक ०९ जून, २०१०.

शासन निर्णय :- राज्यातील नगरपालिका / महानगरपालिकांना सन २०१०-२०११ या वित्तीय वर्षात रस्ता अनुदान देणे या योजनेखाली नगरपरिषद बीड, जि. बीड यांना रुपये १,५०,००,०००/- (अक्षरी रुपये एक कोटी पन्नास लक्ष फक्त) या शासन निर्णयाद्वारे वितरीत करण्यास मंजुरी देण्यात येत आहेत.

०२. उपरोक्त निधी बीड नगरपरिषदेस वितरीत करण्यासाठी सहाय्यक संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय,मुंबई यांना " आहरण व संवितरण " अधिकारी म्हणून व आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय,मुंबई यांना " नियंत्रण अधिकारी " म्हणून घोषित करण्यांत येत आहे. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांनी बीड नगरपरिषदेच्या नावे धनादेश काढून तो संचालनालयास देण्यांत यावा. संबधित धनादेशाचे वितरण आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय,मुंबई यांनी तात्काळ करावे. तसेच ज्या जिल्ह्यामध्ये निवडणूक आचारसंहिता सुरु आहे, त्या जिल्ह्यातील नगरपरिषदांना निधी वितरणापूर्वी आचारसंहितेचा भंग होणार नाही, याची दक्षता नियंत्रण अधिकारी यांनी घ्यावी.

०३. जिल्हाधिकारी, बीड यांनी या वित्तीय वर्षातील अनुदान वापराची विनियोग प्रमाणपत्रे संबंधीत नगरपालिकांकडून विहित कालावधीत प्राप्त करुन ती महालेखाकार, मुंबई यांचेकडे लेखापरिक्षणासाठी सादर करावीत व त्याचा अहवाल शासनाकडे तसेच आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, मुंबई यांच्याकडे पाठवावा. तरीत केलेल्या अनुदानाचे उपयोगिता प्रमाणपत्र प्राप्त झाल्याशिवाय यापुढील अनुदान वितरीत केले जाणार नांही याची नोंद सर्व संबंधीत नागरी स्थानिक स्वराज्य संस्था यांनी नोंद घ्यावी.

०४. या करिता होणारा खर्च "मागणी क्र.एफ-२, ३०५४-मार्ग व पूल, ०४-जिल्हा व इतर मार्ग, ८००- इतर खर्च, ३१- सहायक अनुदान, (०२) रस्त्यांची सुधारणा करण्याकरिता नगरपरिषदांना/ महानगरपालिकांना सहायक अनुदान, (०२)(०१) सर्वसाधारण मार्ग अनुदाने (३०५४००२२)" या लेखाशिर्षाखाली खर्ची घालून तो सन २०१०-२०११ या वित्तीय वर्षाकरिता मंजूर करण्यात आलेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.

०५. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.४७२/व्यय-३, दि. २१/१०/२०१० अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(आय.एम. मोरे)
सहसचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,
मा. मुख्यमंत्री यांचे सचिव,मंत्रालय, मुंबई
मा. राज्यमंत्री ( नगर विकास ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई,
आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई ४०० ०३०(५ प्रती ),
जिल्हाधिकारी, बीड
महालेखापाल,महाराष्ट्र-१, मुंबई,
महालेखापाल,महाराष्ट्र-२, नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
मुख्याधिकारी, नगरपरिषद बीड, जि. बीड
मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा,कोकण भवन, नवी मुंबई,
उपमुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा (सर्व विभाग)
वित्त विभाग (व्यय-३, अर्थसंकल्प-१५ / अर्थोपाय शाखा )
कार्यासन अधिकारी, नवि ४, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
निवड नस्ती नवि-१६.

---